**उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव क्षेत्रात आदिवासी मुले व मुलींसाठी वसतीगृह सुरु करण्यासाठी जागा उपलब्ध करुन देण्यास परवानगी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक उमवि २०१०/(७५/१०)/विशि-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २० ऑक्टोबर, २०११

**वाचा:** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक शावगृ २००६/प्र.क्र.६५/का. १२, दिनांक ६ डिसेंबर, २००७

२) उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव यांचे पत्र क्रमांक उमवि/१०/३४५/३८५/२००७, दिनांक ०७.११.२००७

३) उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक उमवि/२/२५३, दिनांक २२.०९.२०११

**प्रस्तावना:** अनुसूचीत जमातीच्या विद्यार्थ्यांकरीता नवीन १४० शासकीय वसतीगृह सुरु करण्याबाबत शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक शावगृ २००६/प्र.क्र.६५/का. १२, दिनांक ६ डिसेंबर, २००७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने जळगाव येथे बांधावयाच्या वसतीगृहासाठी विद्यापीठाने नाममात्र दराने जागा उपलब्ध करुन द्यावी, अशी विनंती प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यावल, जिल्हा जळगाव यांनी विद्यापीठास केली आहे. त्या अनुषंगाने उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाने उपरोक्त संदर्भीय क्रमांक २ व ३ येथील पत्रान्वये प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून प्रस्तावास महाराष्ट्र विद्यापीठ अधिमियम, १९९४ चे कलम ८ (१) (ड) नुसार शासनाची मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या क्षेत्रात ५०० क्षमतेचे मुलांचे व २५० क्षमतेचे मुलींचे वसतीगृह सुरु करण्यासाठी सर्वसाधारणपणे ३ ते ५ एकर इतक्या जागेची आवश्यकता आहे. सदर विद्यापीठाने मुलांच्या वसतीगृहासाठी १ हेक्टर ५० आर तसेच मुलींच्या वसतीगृहासाठी १ हेक्टर ०० आर अशी एकूण २ हेक्टर ५० आर जमीन आदिवासी मुला-मुलींच्या वसतीगृहासाठी रुपये १/- (एक) नाममात्र भाडे घेऊन ३५ वर्षांच्या भाडेपट्टीवर देण्याबाबतचा ठराव व्यवस्थापन परिषदेने ठराव क्रमांक व्यपए-५०/२००७, दिनांक १३.०३.२००७ अन्वये संमती दिलेली आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव यांचेकडून आदिवासी विकास विभागाकडे आवश्यक तो प्रस्ताव सादर करण्यात येईल. या अटीस अधिन राहून उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव या विद्यापीठ क्षेत्रात दिनांक ६ डिसेंबर, २००७ मधील शासन निर्णयानुसार आदिवासी मुला-मुलींकरीता वसतीगृहासाठी एकूण २ हेक्टर ५० आर इतकी जमीन रुपये १/- (एक) नाममात्र भाडे घेऊन ३५ वर्षांच्या भाडेपट्टीवर आदिवासी विकास विभागास हस्तांतरीत करण्याच्या प्रस्तावास महाराष्ट्र विद्यापीठ अधिमियम, १९९४ चे कलम ८ (१) (ड) नुसार खालील अटीस अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(१) जमीनीची मालकी विद्यापीठाकडेच राहील.

(२) वसतीगृहाच्या बांधकामासाठी संपूर्ण निधी आदिवासी विभागाकडून वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येईल.

(३) वसतीगृहासाठी लागणारा कर्मचारीवृंद आदिवासी विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल व त्यांची संपूर्ण सेवा विषयक जबाबदारी त्याविभागाची राहिल.

(कृ. मा. प.)

(४) वसतीगृहाच्या प्रशासन विषयक कामकाजावर आदिवासी विकास विभागाचे नियंत्रण राहील.

३. हा शासन निर्णय शासनाचे संकेतस्थळ www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणकीय सांकेतांक क्र. २०१११०२०१२३१५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( राजाराम जाधव )
शासनाचे उपसचिव

प्रति,

मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
मा. प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
कुलगुरु, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव,
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव /पुणे
मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई